लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४
**जि. गडचिरोली येथील ईव्हीएम व व्हीव्हीपॅटचे स्ट्रॉग रुम व मतमोजणी केंद्राच्या दुरुस्तीच्या स्थापत्य अभियांत्रिकी कामांना प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सीईएल-२०२४/प्र.क्र.३८२/२४/३३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ एप्रिल, २०२४

**वाचा :-** १) जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, गडचिरोली यांचे क्र.कार्या-१०/अ.का. आस्था/निवड/कावि-१०३५/२०२४, दि.०३.०४.२०२४ रोजीचे पत्र.
२) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९

**शासन निर्णय :-**

जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, गडचिरोली याच्या दि.०३.०४.२०२४ च्या संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४ करीता कृषि महाविद्यालय, सोनापूर गडचिरोली येथील स्ट्रॉग रुम व मतमोजणी केंद्राच्या दुरुस्तीच्या स्थापत्य अभियांत्रिकी कामांच्या **एकूण रु.२९,४५,०००/-** इतक्या किंमतीचा सुधारीत अंदाजपत्रकाचा प्रस्ताव या कार्यालयास प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावाच्या अंदाजपत्रकातील कामाचे विवरणपत्र पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | स्थापत्य अभियांत्रिकी कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय किंमत |
|---|---|---|
| १ | Miscellaneous Work for Making Postal Ballot Counting Hall, Media Room, Control Room, Store Room and Wash Room at Gr. Floor for Loksabha Election Work at Government Agriculture College Building Gadchiroli Tal. Dist. Gadchiroli | ८,७०,०००/- |
| २ | Miscellaneous work for Observer Room, RO Room, Strong Room & Counting Hall of Aheri Amgaon, Chimur Armori, Securiyty Room, Medical Response Team Room and Wash rooms at Fr. Floor for Loksabha Election Work at Government Agriculture College Building Gadchiroli Ta. & Dist. Gadchiroli. | १४,२१,०००/- |
| ३ | Miscellaneous work for Strong Room and Counting Hall of Gadchiroli and Brahmapuri, Security Rooms (2Nos.), Statutory and Non-Statutory Envelop Room, and Wash Rooms at Second Floor for Loksabha Election Work at Government Agriculture College Building Gadchiroli Ta. & Dist. Gadchiroli. | ६,५४,०००/- |
| | **एकूण** | **२९,४५,०००/-** |

२. वरील तक्त्यात नमूद केल्यानुसार विषयांकित कामाच्या **रु.२९,४५,०००/- (रुपये एकोणतीस लाख पंचेचाळीस हजार फक्त)** इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास पुढीलप्रमाणे नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

(१) वरीलप्रमाणे करण्यात येणाऱ्या जि. गडचिरोली येथील मतमोजणी केंद्र व मतदानानंतर मोहोरबंद ईव्हीएम व व्हीव्हीपॅट ठेवण्याच्या सुरक्षा कक्ष (स्ट्रॉग रुम) च्या स्थापत्य कामे कमीत कमी खर्चात व भारत निवडणूक आयोगाच्या मार्गदर्शक तत्वांप्रमाणे गुणवत्तापूर्ण होतील याबाबतची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील, त्याकरीता विहित कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

(२) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येणार नाही याद्दष्टीने दक्षता घेवून काम लवकरात लवकर पूर्ण करण्यात यावे.

(३) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

(४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

(५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

(६) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

(७) दुरुस्तीकरीता आवश्यक असलेल्या वस्तु भाडयाने घेण्यात याव्यात की खरेदी करण्यात याव्यात याबाबत तुलनात्मक विचार करुनच कार्यवाही करण्यात यावी. तसेच खरेदी करण्यात आलेल्या वस्तु पुढील निवडणुकीकरीता वापरु शकत असल्यास वापरण्यात याव्यात व नसल्यास सदर वस्तूंचे निर्लेखन करण्यात यावे. निर्लेखन करुन येणारी किंमत शासकीय लेख्यात जमा करण्यात यावी.

(८) सदरचे काम करताना कामाची पुनारावृत्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता संबंधित कार्यकारी अभियंता यांनी घ्यावी.

३. या बाबींवर होणारा खर्च **"मागणी क्रमांक ए-०२, मुख्य लेखाशीर्ष २०१५-निवडणुका, १०५-संसदेच्या निवडणुका घेण्यासाठी लागणारा खर्च, (००)(०१)संसदेच्या निवडणुका घेण्यासाठी लागणारा खर्च, १३-कार्यालयीन खर्च (२०१५ ००५९)"** या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९ सोबतच्या परिशिष्ट भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१ परिच्छेद क्र.१३४(१) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात तसेच प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०४०८११४४११६९०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YOGESH
MAHADEO GOSAVI

Digitally signed by YOGESH MAHADEO GOSAVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=409605c5c875f777d39cbf4ca29ce3d56c5c1d7c1ea54667614a049c47985d83, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D910025DFF598286A45B3B22318E6C113E071B7C6E85F3D06BECDD5995FC1966, cn=YOGESH MAHADEO GOSAVI
Date: 2024.04.08 11:56:16 +05'30'

**( योगेश गोसावी )**
**अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रति :-**

जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी ,गडचिरोली

**प्रत -**

१. महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेय) नागपूर.

२. महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखापरिक्षा), नागपूर
३. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली
४. मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, नागपूर विभाग
५. अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, गडचिरोली
६. कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, गडचिरोली
७. निवडनस्ती (सा.प्र.वि. कार्यासन ३३).